"डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड येथील कुलसचिव पद भरण्यास मान्यता देणेबाबत....."

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : तंशावि-३७११/(९५/१६)/तांशि-२**

मंत्रालय विस्तार भवन,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक : १७ जानेवारी, २०१९

**संदर्भ :** कुलगुरू, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे यांचे क्रमांक डॉबाआंतंवि/आस्था/कुलसचिव/२०१८/८८२, दिनांक १७/१०/२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे येथील कुलसचिव या पदांची भरती करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने, मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तर उपसमितीच्या दिनांक ०८.०१.२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सदर पद भरण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. मा. उच्च स्तर उपसमितीने दिलेली मान्यता विचारात घेता विद्यापिठामधील कुलसचिव पद भरण्यास मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

१. दिनांक ०१.०४.२००४ च्या शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात आलेली डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे येथील कुलसचिव पद खालील विवरणपत्रानुसार भरण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी रूपये | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १. | कुलसचिव | ३७४००-६७०००+ग्रेड वेतन रु. ८७००/- | १ |

२. विद्यापीठामधील उपरोक्त कुलसचिव पदांवर सुयोग्य उमेदवारांची निवड व नियुक्ती करतांना या संदर्भात अस्तित्वात असलेले अधिनियम/परिनियम/शासन निर्णय/परिपत्रके/शासन आदेश वजा सूचना व त्याप्रमाणे विहीत केलेल्या अटी व शर्ती यांचे पालन केले जाईल याची विद्यापीठ प्रशासनाने दक्षता घ्यावी. सदरचे पद विहीत प्रक्रियेचा अवलंब करून तात्काळ भरण्यात यावेत व कार्यपूर्ती अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६२०/आपुक, दिनांक ०२.११.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८१५१५१०३८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash
Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e9859a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2019.01.18 15:47:39 +05'30'

**(प्रकाश भा. आव्हाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१
५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
६. सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे
७. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय (मुंबई/ पुणे/ नाशिक/औरंगाबाद/अमरावती/ नागपूर)
८. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
९. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. संचालक, लेखा व कोषागारे,
१३. अभिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४. सर्व कार्यासने, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१५. निवड नस्ती (तांशि-२)